**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**कै. (श्री.) महेंद्र देविदास ढगे, सहशिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२३/प्र.क्र.१०३/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ७ मार्च, २०२४.

संदर्भ :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/ टीएनटी-६,दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद वर्धा यांचे क्र.जिपव/प्राशिवि/ शिक्षक/आस्था/वशि/३१०३/२०२२, दि.१५/१२/२०२२ चे शिफारस पत्र
४) शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. प्राशिसं/८०२/संकीर्ण/९३७७/२०२३, दि. १५/१२/२०२३.

ज्ञापन :-

कै. (श्री.) महेंद्र देविदास ढगे, सहशिक्षक, जिल्हा परिषद उच्च प्राथमिक शाळा, गिरड, पंचायत समिती समुद्रपूर, जि.वर्धा यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक १५/०६/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार कै.(श्री.) महेंद्र देविदास ढगे यांच्या वारसास रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील दि.१५/१२/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केला आहे. तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी संदर्भ क्र. (३) येथील दि.१५/१२/२०२२ रोजीच्या पत्रान्वये कै.(श्री.) ढगे यांच्या परिवारास रु.५० लाख विमा कवच सानुग्रह अनुदान सहाय्य मिळण्याकरिता शिफारस केली आहे.

३. कै.(श्री.) महेंद्र देविदास ढगे यांची उपविभागीय अधिकारी तथा उपविभागीय दंडाधिकारी, हिंगणघाट यांच्या दि.२०.४.२०२१ रोजीच्या आदेशान्वये कोरोना विषाणूचा प्रादुर्भाव व प्रसार टाळण्याच्या दृष्टीने संस्थात्मक विलगीकरण केलेल्या व्यक्तींच्या ठिकाणी/शाळेत/ग्रामदक्षता/प्रभाग समिती ठरवेल त्या वेळेनुसार कामकाज पाहणे व नियमित कामकाजाचा दैंनंदिन अहवाल त्या कार्यालयास सादर करण्याकरिता नियुक्ती करण्यात आली होती. गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती, समुद्रपूर यांनी दि. जुलै, २०२१ च्या प्रमाणपत्रान्वये कै.(श्री.) ढगे यांनी गिरड, ता.समुद्रपूर परिसरात गृह विलगीकरणात ठेवण्यात आलेले करोना रुग्ण व त्यांच्या संपर्कात आलेल्या व्यक्तींवर देखरेख ठेवून त्यांना शासन नियमानुसार मदत मिळण्याच्या कामी दि.२०/०४/२०२१ ते ०५/०५/२०२१ अखेर कर्तव्यावर हजर राहून कामकाज केल्याचे प्रमाणित केले आहे.

४. सदर कर्तव्य बजावित असतांना त्यांना कोरोना-१९ विषाणूची लागण झाल्याने तसेच, हेल्थ केअर ॲण्ड डायग्नोस्टिक सेंटर, नागपूर यांच्या रिपोर्टनुसार कै. (श्री.) ढगे यांची दि. ०६/०५/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आल्याने कोविड-१९ साठीचे उपचाराकरिता त्यांना एव्हरशाईन हॉस्पिटल,गणेशपेठ, नागपूर या ठिकाणी दि.०६/०५/२०२१ रोजी दाखल करण्यात आले. सदर हॉस्पिटलमध्ये कै.(श्री.) ढगे यांचेवर दि.०६/०५/२०२१ ते १९/०५/२०२१ या कालावधीत कोव्हिड-१९ वर उपचार करण्यात आले. तद्नंतर दि.१९/०५/२०२१ रोजी कै.(श्री.) ढगे यांना क्रीम्स हॉस्पिटल लि., नागपूर येथे दाखल करण्यात आले. सदर हॉस्पिटलमध्ये कै.(श्री.) ढगे यांचेवर दि.१९/०५/२०२१ ते दि.१५/०६/२०२१ या कालावधीत कोव्हिड-१९ वर उपचार करण्यात आले. उपचारा दरम्यान दि.१५/०६/२०२१ रोजी त्यांचा मृत्यु झाला. याबाबतचे वैद्यकीय प्रमाणपत्र (फॉर्म क्र.४) द्वारे वैद्यकीय अधिक्षक, (रजिस्ट्रेशन क्र.३७२) , क्रीम्स हॉस्पिटल लि.,रामदास पेठ, नागपूर यांनी प्रमाणित केले आहे.

५. निबंधक, नागपूर महानगरपालिका, नागपूर यांनी त्यांच्या दि.२४/०६/२०२१ रोजीच्या प्रमाणपत्रान्वये कै. (श्री.) ढगे यांचा दिनांक १५/०६/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र सादर केले आहे.

६. मा. दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर, समुद्रपूर यांनी कै. (श्री.) ढगे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती भारती महेंद्र ढगे (पत्नी), (२) कु. अर्णव महेंद्र ढगे (मुलगा), (३) कु. हिमा महेंद्र ढगे (मुलगी) व (४) श्रीमती ललिता देविदास ढगे (आई) यांना घोषित केले आहे.

७. गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती, समुद्रपूर व शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद वर्धा, तसेच वैद्यकीय अधिक्षक, क्रीम्स हॉस्पिटल लि.,रामदास पेठ, नागपूर यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,

पुणे यांनी कागदपत्रांची पडताळणी करून संदर्भ क्र. ४ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार कै. (श्री.) महेंद्र देविदास ढगे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती भारती महेंद्र ढगे (पत्नी), (२) कु. अर्णव महेंद्र ढगे (मुलगा), (३) कु. हिमा महेंद्र ढगे (मुलगी) व (४) श्रीमती ललिता देविदास ढगे (आई) यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच/सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

८. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३८०/२०२२/व्यय-९, दिनांक ०५/१२/२०२२ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर."

९. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३०७१६०१४२६५२१ असा आहे. सदर शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.07 16:11:07 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), नागपूर

**प्रत माहितीसाठी:-**

१. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती भारती महेंद्र ढगे, मु.पो.गिरड, ता.समुद्रपूर, जि-वर्धा-४४२३०५.
४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र. १०३/२०२३)